**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनेत्तर बाबीकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०२४ ते जून, २०२४ या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ-२०२४/प्र.क्र.७५/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ६ मे, २०२४.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२३/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल,२०२४.

२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१०/का-०४/२०२४-२५, दि.१६ एप्रिल, २०२४ चे पत्र व सहपत्र.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाकरिता अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी विनंती केलेली आहे. त्यानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधीमधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाचा कार्यालयीन खर्च भागविण्याकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग शासन परिपत्रक दिनांक १ एप्रिल, २०२४ मधील मार्गदर्शक सुचनांनुसार सद्यस्थितीमध्ये एकूण रू.५,५२,०००/- इतका निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे.

२. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी सदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये, माहे एप्रिल, २०२४ ते जुन, २०२४ या तीन महिन्यांच्या कालावधीतील महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचा कार्यालयीन खर्चाकरिता **रु.४,०४,७००/- (अक्षरी रुपये चार लक्ष चार हजार सातशे फक्त)** एवढे अनुदान उपलब्ध करून देण्याची विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या उद्दिष्टाखाली सद्यस्थितीत बीम्स प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीपैकी **रु.४,०४,७००/- (अक्षरी रुपये चार लक्ष चार हजार सातशे फक्त )** एवढे अनुदान महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२४-२५ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. आयोगाने कोणत्याही प्रकारची खरेदी वा दुरुस्ती करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे तंतोतंत पालन करावे. तसेच ज्या उद्दीष्टाकरिता निधी वितरीत करण्यात आले आहे केवळ त्याकरिताच खर्च करण्यात यावे. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनास वेळोवेळी सादर करणे बंधनकारक आहे. संदर्भ क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०२४ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५०६१५२८५२०९१४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SARANGKUMAR VASANTRAO PATIL

Digitally signed by SARANGKUMAR VASANTRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47644BA707F1CC419E5362269A74B7B1EC6AB4F745648DEF2597546D88711BB4, cn=SARANGKUMAR VASANTRAO PATIL
Date: 2024.05.06 15:44:01 +05'30'

**( सारंगकुमार पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).